**नागपूर येथे दि. २७ व २८ फेब्रुवारी २०१९ रोजी उष्णतेच्या लाटे (Heat Wave) बाबतच्या राष्ट्रीय कार्यशाळेचे आयोजन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग ( मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्रमांक : आव्यप्र-२०१८/प्र.क्र.३००/आव्यप्र-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक १६.०२.२०१९

**प्रस्तावना:-**

दरवर्षी होणा-या वातावरण बदल व उष्णतेमध्ये होणारी वाढ लक्षात घेता, येणा-या उष्णतेच्या लाटेपासून बचाव करण्यासाठी दरवर्षी राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाकडून उष्णता प्रवण राज्यामध्ये कार्यशाळा आयोजित केल्या जातात.या वर्षी सदर कार्यशाळा महाराष्ट्र राज्याच्या सहयोगाने दि. २७ व २८ फेब्रुवारी २०१९ रोजी आयोजित करण्यात आली आहे. या कार्यशाळेत तज्ञ व्यक्ती तसेच आपत्तीप्रवण राज्यातील प्रतिनिधी उपस्थित राहणार आहेत. त्यांना उष्णतेच्या लाटेसंदर्भात आलेले अनुभव विचारात घेवून त्यावर करण्यात येवू शकणारी दिर्घकालीन उपाययोजना याबाबत चर्चा होणार आहे. सदर कार्यशाळेच्या आयोजनाची जबाबदारी जिल्हाधिकारी नागपूर यांचेवर सोपविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांच्या सहकार्याने उष्णतेच्या लाटेबाबतची राष्ट्रीय कार्यशाळा दि. २७ व २८ फेब्रुवारी २०१९ रोजी नागपूर येथे आयोजित करण्याची संपूर्ण जबाबदारी जिल्हाधिकारी नागपूर यांच्यावर सोपविण्यात येत आहे.

या कार्यशाळेचे आयोजन यशस्वीरित्या करण्यासाठी जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाचे अध्यक्ष म्हणून त्यांनी सदर कार्यशाळेच्या आयोजनासाठी निवास व्यवस्था चहा/अल्पोपहार आणि भोजन व्यवस्था, कार्यशाळेस येणा-या मान्यवरांसाठी वाहतुक व्यवस्था कार्यशाळेदरम्यान आवश्यक असलेली उपाययोजना उदा. हॉल, बैठक व्यवस्था, एल.ई.डी. स्क्रीन, लॅपटॉप, प्रोजेक्टर,माईक, बॅनर, फलेक्स व अनुषंगिक बाबींची व्यवस्था करावी.

जिल्हाधिकारी, नागपूर यंनी वरील बाबींची व्यवस्था करताना प्रचलित असलेले वित्तीय नियम विचारात घेवून कार्यवाही करावी.

या कार्यशाळेसाठी राज्य शासनाने मंजूरी दिला असलेला रू. ६ लक्ष निधी राज्य आपत्ती सौम्यीकरण निधी या मध्ये जमा करण्यात आला आहे.

लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग यांनी सदर कार्यक्रमासाठी मंजूर असलेलाआणि राज्य आपत्ती सौम्यीकरण निधीमध्ये जमा असलेला रू. ६,००,०००/- (रू. सहा लक्ष फक्त) एवढा निधी जिल्हा आपत्ती व्यवस्थापन सौम्यीकरण निधी (District Disaster mitigation Fund) A/C no. ३१९४१०६६९९३, State Bank Of India, IFSC Code- SBIN०००००४३२ मध्ये आर.टी.जी.एस. द्वारे अदा करावा.

राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांच्याकडून उपलब्ध होणारा रू. ४,००,०००/- (रू. चार लक्ष फक्त) एवढा निधी नागपूर जिल्हयाच्या जिल्हा आपत्ती व्यवस्थापन सौम्यीकरण निधी या लेखामध्ये जमा करण्यात येईल.

वरील प्रमाणे उपलब्ध होणारा रू. १०,००,०००/- (रूपये दहा लक्ष फक्त) या निधी व्यतिरिक्त जास्त खर्च झाल्यास सदर खर्च जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणास क्षमताबांधणीकरीता राज्य शासनाने उपलब्ध केलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

जिल्हाधिकारी, नागपूर यांनी वरील कार्यशाळेच्या आयोजनासंदर्भात उपलब्ध झालेला निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

सदर आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४७/व्यय-९/२०१८ दि. १/१/२०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharasghtra.gov.in या संकेस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१९०२१८१५०९४७२११९ असा आहे. सदर आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrirang Shripati Gholap

Digitally signed by Shrirang Shripati Gholap
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DMU/R AND R, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e1b6e289fe7dcde27c972916398d8220a134ed8ebf6439e54d1927c5c4b28bec, cn=Shrirang Shripati Gholap
Date: 2019.02.18 15:11:34 +05'30'

**(श्रीरंग घोलप)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव , वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) महासंचालक, यशदा, पुणे.
३) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
६) आयुक्त, महानगरपालिका, नागपूर.
७) जिल्हाधिकारी, नागपूर
८) महालेखापाल, महाराष्ट्र ½, मुंबई.
९) वित्तीय सल्लागार, सह सचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवड नस्ती.